सन २०१६-१७ करीता भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५ (१) निधी वितरणास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१६/प्र.क्र.६४/का.-१९**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: १०/०२/२०१७

वाचा -

१. आदिवासी विकास विभागाचे पत्र क्र.केंद्रीय २०१६ /प्र.क्र.०९/का-१९ दि.२९/०७/२०१६
२. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/४(१४)/२०१६-Grant, दि.२७/०६/२०१६
३. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/४(१४)/२०१६-Grant, दि.२८/०६/२०१६
४. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/४(१४)/२०१६-Grant, दि.२६/०९/२०१६ (दोन पत्रे)
५. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/२८/२०१६-Grant, दि.१७/११/२०१६

प्रस्तावना (Preamble) -

राज्य शासनाच्या संदर्भ क्र. १ वरील पत्राद्वारे भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) या योजनेखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्यात आले आहेत. सादर प्रस्तावांपैकी एकुण रु. १०५५३.०० लक्ष इतका निधी प्रस्ताव मंजूरी पुर्व (Ad-hoc) स्वरुपात वितरीत केला आहे. सदर वितरीत निधीतून एकलव्य मॉडेल आश्रमशाळांकरीता आवश्यक असणारी आवर्ती खर्चाची रक्कम, सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये मान्यता प्रदान करण्यता आलेल्या तीन एकलव्य मॉडेल आश्रमशाळांच्या बांधकामाकरीता दुसरा व अंतिम हफ्ता व सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर करण्यात आलेल्या दोन नवीन एकलव्य मॉडेल आश्रमशाळांच्या बांधकामाकरीता पहीला हफ्ता खर्च करण्यास जनजाती कार्यमंत्रालयाने संदर्भ क्र. ५ वरील पत्रान्वये मान्यता प्रदान केली आहे. सदर रक्कम अंमलबजावणी यंत्रणेस वितरीत करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

## शासन निर्णय (Government resolution)-

शासन आता या निर्णयाद्वारे केंद्र शासनाने भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५ (१) या कार्यक्रमाखाली सन २०१६-१७ करिता वितरीत एकूण रु. १०५५३.०० लक्ष निधीतुन एकलव्य मॉडेल आश्रमशाळांकरीता केंद्र शासनाने मंजूरी प्रदान केलेला निधी खालील तालिकेत स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या निधीच्या मर्यादेत खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | योजनेचे नाव | यापुर्वी वितरीत निधी (रु.लाखात) | वितरीत करण्यात येणारा निधी (रु.लाखात) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | Recurring grants for 16 EMRS Rs.42000/student (3600students) | १४८६.८० | २५.२० |
| २. | Balance grant for 3 EMRSs sanctioned during 2015-16 (Final Installment)<br>1. Shendegaon (Bhatasa Nagar) Tal : Shahapur Dist : Thane.<br>2. Sahastrakund Tal.Kinwat Dist.Nanded<br>**3.** Dewada Tal.Rajura Dist.Chandrapur | ०.०० | २७००.०० |
| ३. | Construction of 2 new EMRSs at Gadchiroli District and Nashik District | ०.०० | ४००.०० |
| | **एकुण** | १४८६.८० | ३१२५.२० |

उपरोक्त रु. ३१२५.२० लक्षचा खर्च मागणी क्र. टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - ०२ - अनुसूचित जमातीचे कल्याण - ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (४३) भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५ (१) अन्वये केंद्रीय सहाय्य, ३१ सहायक अनुदाने (२२२५ २४२४) (वेतनेतर) यामधील सन २०१६-१७ मध्ये अर्थसंकल्पित असलेल्या निधीतून करण्यात यावा.

सदर निधी अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आला आहे. वितरीत निधीच्या मर्यादेत निधी आहरीत करण्याची दक्षता आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी घ्यावी.

उपरोक्त मंजूर करण्यात आलेले अनुदान ते ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

**सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४७/अर्थोपाय, दिनांक २७/०६/२०१६ व अनौ-४४/अर्थोपाय, दि. ३०/०१/२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१३१५४३२६८२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Lalitkumar R Dhaygude

Digitally signed by Dr. Lalitkumar R Dhaygude
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=77ee43feb646b7ae43865425ca1d67a75cd7607faeae62a4e9bad488155d6d28, cn=Dr. Lalitkumar R Dhaygude
Date: 2017.02.13 15:47:45 +05'30'

**( डॉ. ललितकुमार धायगुडे )**
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. अवर सचिव, भारत सरकार, जनजाती कार्य मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली.
४. खाजगी सचिव, मा. मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.उपसचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अधिकारी , का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.